सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागासाठी इंटरनेट प्लान पुरवठा करण्याबाबत मे. टाटा टेली सर् विभागांतर्गत ई-गव्हर्नन्स प्रकल्प तसेच विभागाच्या योजनांच्या सहाय्याकरीता तांत्रिक सल्लागार नियुक्त करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
शासन निर्णय क्रमांक: सीओएम-२०१५/प्र.क्र.१२/विजाभज - १
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २६ मार्च,२०१५

**वाचा** : १) शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.२१५६/फाईल/डीआयटी/२०१२, दि.२१.९.२०१२
२) शासन निर्णय माहिती तंत्रज्ञान (सा.प्र.वि.) विभाग क्र. MH-९/१७९/२०१३ -DIR-DIT(MH)-DIT(MH)] दि. २.११.२०१३
३) शासन निर्णय सा.न्या. व वि.स.विभाग क्र : सकआ-२०१३/प्र.क्र.३८९/आस्था-२, दि.१२.११.२०१३
४) शासन निर्णय सा.न्या. व वि.स.विभाग क्र. सीओएम-२०१३/प्र.क्र.९६/विघयो, दि. २०.०१.२०१४
५) माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाचे पत्र क्र.DIT-०९/File-११/८८/३९, दि. १८.०२.२०१४.
६) शासन निर्णय माहिती तंत्रज्ञान (सा.प्र.वि.) विभाग क्र.मातंस ०८०/४/२०१४-०/० -DIR-IT-DIT(MH)] दि. ०१.०७.२०१४
७) शासन निर्णय सा.न्या. व वि.स.विभाग क्र. सीओएम-२०१३/प्र.क्र.९६/विघयो, दि. २८.०५.२०१४ व दि.२८.०८.२०१४

**शासन निर्णय** :

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दि. १/७/२०१४ अन्वये, शासनाचे विविध विभाग आणि त्यांच्या नियंत्रणाखालील कार्यालये इत्यादींना ई-गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यात सहाय्य करण्यासाठी व सल्ला देण्यासाठी खालील संस्थांची ३ वर्षांच्या कालावधीसाठी सल्लागार संस्था म्हणून निवड (empanlled) केली आहे :-

१) मे. ॲक्सेंचर सर्व्हिसेस प्रा.लि.
२) मे. ई ॲण्ड वाय प्रा.लि.
३) मे. पी.डब्ल्यू.सी. प्रा.लि.
४) मे. के.पी.एम.जी.
५) मे. डे लाईट इंडिया प्रा.लि.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या सुचनेनुसार विभागांतर्गत ई-गव्हर्नन्स प्रकल्प तसेच विभागाच्या योजना राबविण्यासंदर्भात तांत्रिक सल्ला देण्याकरिता माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या पॅनलवरिल मे. ॲक्सेंचर सर्व्हिसेस प्रा.लि. मे. ई ॲण्ड वाय प्रा.लि, मे. पी.डब्ल्यू.सी. प्रा.लि, मे. के.पी.एम.जी, मे. डे लाईट इंडिया प्रा.लि, या पाच कंपन्यांना दि. २७.०१.२०१५ रोजी आयोजित केलेल्या विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत सादरीकरण करण्याबाबत कळविण्यात आले होते. त्यानुसार मे. के.पी.एम.जी. व मे. डे लाईट इंडिया प्रा.लि. वगळता उर्वरित ३ कंपन्यांनी त्यांचे सादरीकरण केले. सदर तीन कंपन्यांनी केलेले सादरीकरण विचारात घेऊन विभागाच्या ई-गव्हर्नन्स प्रकल्पासाठी तसेच विभागाच्या विविध योजनांसाठी तांत्रिक सहाय्य देण्याकरीता प्रकल्प अंमलबजावणी समितीने मे. ई ॲण्ड वाय प्रा.लि.या कंपनीची निवड केली.

३. प्रकल्प अंमलबजावणी समितीने घेतलेल्या निर्णयानुसार विभागाच्या ई गव्हर्नन्स प्रकल्पासाठी तसेच विभागाच्या विविध योजनांसाठी तांत्रिक सहाय्य देण्याकरिता माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या पॅनलवरील मे. ई ॲण्ड वाय प्रा.लि.सल्लागार संस्थेस खालील प्रमाणे दि १.४.२०१५ पासून ६ महिन्याकरिता १ तांत्रिक सल्लागार पुरविण्याबाबत कार्यारंभ आदेश देण्यात येत आहे.

| अ.क्र. | सल्लागाराचा वर्ग | दर (प्रतिमहा) |
|---|---|---|
| १ | सल्लागार | रु.१,६०,०००/- |
| | एकुण | रु.१,६०,०००/- दरमहा |

४. वरीलप्रमाणे नियुक्त करण्यात आलेल्या सल्लागारास सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १/७/२०१४ च्या शासन निर्णय मधील अटींनुसार अनुभव आवश्यक राहील. तसेच नियुक्ती संदर्भातील अटी खालीलप्रमाणे असतील-

१) कार्यालयीन कामासाठी केलेला प्रवास, भोजन, निवास इत्यादी बाबींवर सल्लागारांने केलेला खर्च उपरोक्त शासन निर्णयातील तरतुदीनुसार सल्लागारास अनुज्ञेय राहील. त्यासाठी सल्लगारांना त्यांची देयके वेगळीच सादर करणे आवश्यक राहील अन्य दुस-या देयकासोबत देयक सादर केल्यास ती अदा करण्यात येणार नाहीत.

२) सल्लागार पदावर नियुक्तीसाठी निवड केलेल्या व्यक्तीने कंपनीने कमीत कमी ६ महिने सेवा केली असणे आवश्यक आहे.

३) सल्लागार पदावर नियुक्त केलेल्या व्यक्तींना माहिती तंत्रज्ञान संचालनालयाचे ई-गव्हर्नन्स विषयक प्रमाणपत्र विशेष प्राविण्यासह मिळविणे अनिवार्य राहील.

५. वरीलप्रमाणे नियुक्त केलेल्या सल्लागारांची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

१) विभागाची अद्ययावत वेबसाईट विकसीत करणेसंदर्भात सल्ला देणे.

२) विभागाच्या अधिपत्याखालील कार्यरत असलेल्या महामंडळासाठी लोन मॅनेजमेंट सिस्टीमकरीता सॉफ्टवेअर तयार करणे.

३) समाजकल्याण आयुक्तालय, अपंग कल्याण आयुक्तालय व वि.जा.भ.ज. संचालनालयातील आवक/जावक टपालाच्या नियंत्रणासाठी प्रणाली राबविण्यासाठी मार्गदर्शन करणे.

४) आयुक्त, समाजकल्याण, पुणे कार्यालयाकडून क्षेत्रीय कार्यालयांना वितरीत करण्यात येणाऱ्या निधीची व खर्च होणाऱ्या निधीची माहिती ऑनलाईन उपलब्ध होण्याकरीता (मासिक खर्च व भौतिक प्रगती अहवाल) प्रणाली विकसित करण्यासाठी सल्ला देणे.

५) ई-शिष्यवृत्ती विषयक विविध योजनांचे ई-गर्व्हनन्स अंतर्गत सुरु असलेले कामकाज हाताळण्यासाठी मार्गदर्शन/सहकार्य करणे.

६) विशेष सहाय्य अंतर्गत राबविण्यात येणाऱ्या आम आदमी विमा योजना व NSAP च्या योजनांचे ई-गर्व्हनन्स अंतर्गत प्रगतीपथावर असलेले कामकाजाबाबत सल्ला देणे.

७) जात प्रमाणपत्र पडताळणीसाठीच्या डाटाचे डिजिटायझेशन (Digitization) करण्याकरीता मार्गदर्शन करणे.

८) आश्रमशाळेचे अनुदानासाठी ऑनलाईन प्रक्रीया राबविण्याच्या कामाबाबत सल्ला देणे.

९) विभागामार्फत वेळोवेळी विकसीत करण्यात येणाऱ्या आज्ञावल्यांच्या अंमलबजावणीसाठी सहाय्य करणे.

१० ) विभागास ई-गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यात तांत्रिक सहाय्य करणे.

११) विभागास तंत्रज्ञाना संबंधी उपस्थित मुदयांवर सल्ला देणे.

१२) विभागाच्या योजनांचे ॲसेसमेंट करून त्यावर उपाययोजना सुचविणे.

१३) विभागाच्या योजनांचे युआयडी लिंकेज करण्यास सहाय्य करणे.

उपरोक्त कामाव्यतिरिक्त नियुक्ती केलेली सल्लागार संस्था सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करणे ( DPR ) बोलींचे व्यवस्थापन ( EW Management ) प्रकल्प व्यस्थापन ( Project Management ) प्रयस्थ लेखा परीक्षण ( Third Party Audit ) इत्यादी काम करील.

६. प्रस्तुत आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय दि. २९.१०.२००१ मधील तरतुदीनुसार स्थापन करण्यात आलेल्या समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरून व सामान्य प्रशासन विभागाच्या ( माहिती व तंत्रज्ञान ) मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या या www.maharashtra.gov.in संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१५०३२६१७०९१२६९२२ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

Vasant Gopal Mane

Digitally signed by Vasant Gopal Mane
DN: CN = Vasant Gopal Mane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.04.06 12:51:07 +05'30'

**( डॉ.व.गो.माने )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
३) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे
५) संचालक, विजाभज, ईमाव व विमाप्र कल्याण, पुणे
६) सहसंचालक, लेखा व कोषागारे,वित्त विभाग , महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) उपसचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, सा.न्या. व वि.स.वि., मंत्रालय, मुंबई
११) मे. ई ॲण्ड वाय प्रा.लि.
१२) निवडनस्ती (विजाभज -१ संगणक).